सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे नियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयासाठी २१- पुरवठा व सामग्री या उदिष्टांखाली रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन) या बाबींची खरेदी लेखाशिर्ष २२१० ०१४६ या उद्दीष्टाखाली मंजूर अनुदानातून करण्यासाठी रू.१०,५०,१६,६००/- एवढया रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०८ ऑगस्ट ,२०२४

वाचा :-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/ कक्ष-३/ टे-४/ नस्ती क्र.४२/ लिनन खरेदी/ २४-२५/ प्र.मा/ १४७७१-७२/२४ दिनांक ३१.०७.२०२४
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/ कक्ष-३/ टे-४/ नस्ती क्र.४२/ लिनन खरेदी/ २४-२५/ प्र.मा/ १४८९१-९२/२४ दिनांक ०१.०८.२०२४
३) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८, दि.२७.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी वाचा मधील अनुक्रमांक १ व २ येथील दिनांक ३१.०७.२०२४ व दि.०१.०८.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनिवार्य खर्चाच्या लेखाशिर्षाखाली व कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या योजनेतंर्गत लेखाशिर्ष २२१० ०१४६ मंजूर असलेल्या अनुदानाच्या मर्यादेत रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन) बाबींची खरेदी करण्यासाठी २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली रू. १०,५०,१६,६००/- ( अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष सोळा हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे अधिनस्त असलेल्या जिल्हा/ विभागीय संदर्भ सेवा/ स्त्री / सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर/ ट्रामा व इतर रुग्णालयासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनिवार्य खर्च व कार्यक्रमांतर्गत खर्च योजना २१- पुरवठा व सामग्री या उदिष्टांखाली मंजूर असलेल्या अनुदानाच्या मर्यादेत रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन) बाबींची खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०१४६, अंतर्गत २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली रू. १०,५०,१६,६००/- ( अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लक्ष सोळा हजार सहाशे फक्त )इतका खर्च अपेक्षित असून सदरचा खर्च सन

२०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१० ०१४६, अंतर्गत २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली मंजुर व उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात येणार आहे.

३. सदर खरेदीसाठीच्या अनुदानाचा व खरेदीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**(अ)**

**विवरणपत्र**
**अ-अनुदानाचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशिल | प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव एकूण किंमत (रु.) |
|---|---|---|---|
| १ | २२१० ०१४६,<br>२१- पुरवठा व सामुग्री | रूग्णालयीन<br>कापड-चोपड (लिनन) | रु.१०,५०,१६,६०० |

**(ब)**

**विवरणपत्र**
**ब-खरेदीचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ. क्र. | रूग्णालयीन कापड-चोपड (लिनन) चे नाव | वार्षिक मागणी सन २०२४-२५ | प्रशासकीय मान्यता दि.२७.६.२०२४ अन्वये मंजूर संख्या | शिल्लक मागणी (वार्षिक मागणी - प्र.मा. संख्या) | खरेदीसाठी प्रस्तावित संख्या | अंदाजित दर | एकूण आवश्यक निधी ( खरेदीसाठी प्रस्तावित संख्या * अंदाजित दर) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Green Appron surgeon (redymade) Size 38, 40, 42, 44, 46 | १६८१५ | ० | १६८१५ | १६८०० | ६०१ | १००९६८०० |
| 2 | White 2pron surgeon (redymade ) Size 38, 40, 42, 44, 46 | १७३०३ | ० | १७३०३ | १७३०० | ६०१ | १०३९७३०० |
| 3 | Surgeon Dress (Green Appron & Pant) (redymade) Appron Size 36,38, 40, 42, 44, 46 & Pant Size 28,30, 32,34,36,38,40,42 | १९८५२ | १५००० | ४८५२ | ४८०० | ८०१ | ३८४४८०० |
| 4 | Patient's Dress (Female Gown) Blue Colour | ५३७५८ | २२००० | ३१७५८ | ३१७०० | ७५१ | २३८०६७०० |
| 5 | Patients Dress (Male) Top and Payjama Blue Colour | ६००४७ | २२००० | ३८०४७ | ३८००० | ८०१ | ३०४३८००० |
| 6 | Patient's Dress Female Top Blue Colour | ५५०८७ | २२००० | ३३०८७ | ३३००० | ८०१ | २६४३३००० |
| एकूण | | | | | | | १०,५०,१६,६०० |

४. सदर प्रस्तावानुसार खरेदी करावयाच्या बाबींची (वस्तु) यादी सोबतच्या विवरणपत्रामध्ये दर्शविलेली आहे.

५. सहसंचालक आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी सादर कलेल्या प्रस्तावानुसार सदर प्रस्तावास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(१) खरेदी करण्यात येणाऱ्या साहित्य सामुग्रीची आवश्यकता व मागणी याची शहानिशा /खातरजमा करण्यात आल्या नंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच खरेदी करण्यात आलेली साहित्य सामुग्रीची आवश्यकता, मागणी व अवलंबिलेली निविदा प्रक्रिया याची शहानिशा /खातरजमा करण्यात यावी.

(२) खरेदी करण्यात येणाऱ्या साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया करण्यात यावी.

(३) सदर खरेदी सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी करावयाच्या बाबींची खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी. हीच बाब खरेदी करण्यात आलेल्या बाबींकरीता तपासूचन प्रलंबित देयकांची अदायगी करावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे. तसेच त्याचबरोबर प्रलंबित देयकाची अदायगी करण्यापुर्वी राबविण्यात आलेल्या संपूर्ण खरेदी प्रक्रियेत केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात आले होत काय, याची खात्री करावी.

(७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची संबंधितांनी दक्षता घेण्यात यावी.

(८) सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू खरेदीच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा तपशील आयुक्त,आरोग्य सेवा, आयुक्तालय,मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

(९) सदर खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(१०) या कामी होणारा खर्च सदर खरेदीसाठी अंदाजित रू. १०,५०,१६,६००/- इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च सन २०२४ -२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१० ०१४६, अंतर्गत २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टाखाली मंजूर असलेल्या निधीतून भागविण्यात येऊन तो सदरहू लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर बाबींसाठी निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव आगामी अधिवेशनामध्ये सादर करण्याची जबाबदारी सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

(११) सदर खरेदी सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे मार्फत करण्यात यावी. प्रस्तुत निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा तपशील शासनास सादर करावा. सदर खरेदी करताना उदयोग ऊर्जा व कामगार विभागाच्या शा.नि.क्र.भांखस-२०२१/प्र.क्र.४३/उदयोग-४, दि.०९.१२.२०२२ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

६. उपरोक्त परिच्छेद क्र.५ मधील अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त,आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष ),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

७. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०८०८१७०४४१३२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=9869eec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2024.08.08 18:13:09 +05'30'

**(विकास तु. कदम )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)

(शासन निर्णय क्र.प्रशामा-१२२३/प्र.क्र.२५१/आरोग्य-८, दि. ०८.०८.२०२४ चे सहपत्र)

## विवरणपत्र

| सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील वार्षिक मागणीनुसार रूग्णालयीन कापड-चोपड (पेशंट ड्रेस व सर्जन ड्रेस) मागणी | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | रूग्णालयीन कापड-चोपड (लिनन) चे नाव | वार्षिक मागणी सन २०२४-२५ | प्रशासकीय मान्यता दि.२७.६.२०२४ अन्वये मंजूर संख्या | शिल्लक मागणी (वार्षिक मागणी - प्र.मा. संख्या) | खरेदीसाठी प्रस्तावित संख्या | अंदाजित दर | एकूण आवश्यक निधी ( खरेदीसाठी प्रस्तावित संख्या * अंदाजित दर) | शेरा |
| 1 | Green Appron surgeon (redymade) Size 38, 40, 42, 44, 46 | १६८१५ | ० | १६८१५ | १६८०० | ६०१ | १००९६८०० | उद्योग विभाग शासन निर्णय दि.०९.१२.२०२२ अन्वये निश्चित केलेल्या दरानुसार प्रस्तावित. |
| 2 | White 6pron surgeon (redymade ) Size 38, 40, 42, 44, 46 | १७३०३ | ० | १७३०३ | १७३०० | ६०१ | १०३९७३०० | |
| 3 | Surgeon Dress (Green Appron & Pant) (redymade) Appron Size 36,38, 40, 42, 44, 46 & Pant Size 28,30, 32,34,36,38,40,42 | १९८५२ | १५००० | ४८५२ | ४८०० | ८०१ | ३८४४८०० | |
| 4 | Patient's Dress (Female Gown) Blue Colour | ५३७५८ | २२००० | ३१७५८ | ३१७०० | ७५१ | २३८०६७०० | |
| 5 | Patients Dress (Male) Top and Payjama Blue Colour | ६००४७ | २२००० | ३८०४७ | ३८००० | ८०१ | ३०४३८००० | |
| 6 | Patient's Dress Female Top Blue Colour | ५५०८७ | २२००० | ३३०८७ | ३३००० | ८०१ | २६४३३००० | |
| एकूण | | | | | | | १०,५०,१६,६०० | |